**श्रीमती. इंदिरा गांधी यांच्या स्मरणार्थ महाराष्ट्र शासनाचा राष्ट्रीय एकात्मता पुरस्कार देण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## अल्पसंख्याक विभाग

## शासन निर्णय क्रमांकः अविवि-२०१३/प्र.क्र.११२/का.८

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीखः : ०७ ऑगस्ट, २०१४.

**वाचा -**

1. **शासन निर्णय क्रमांकः सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-एनआयसी-१०८७/१५३५/सीआर-३१/अ.क.,दि.०४.०१.८९.**
2. **शासन निर्णय क्रमांकः सामान्य प्रशासन विभाग, क्र.आयजीए-२००५/प्र.क्र.८६/२००५/३५, दि.१४.११.२००५.**
3. **शासन निर्णय क्रमांकः अल्पसंख्यांक विकास विभाग, अविवि-२०१२/प्र.क्र.५९/का.८, दि.२३.१०.२०१२.**
4. **शासन निर्णय क्रमांकः अल्पसंख्यांक विकास विभाग, अविवि-२०१२/प्र.क्र.५९/का.८, दि.२८.१०.२०१३.**

**प्रस्तावना -**

माजी पंतप्रधान श्रीमती इंदिरा गांधी यांचया स्मरणार्थ निवडक व्यक्तींनी व संस्थांना राष्ट्रीय एकात्मता पुरस्कार देण्याचा निर्णय दि.०४.०१.१९८९ च्या शासन निर्णयान्वये घेण्यात आला आहे. राष्ट्रीय एकात्मतेसाठी ज्या व्यक्तींना व संस्थांनी उत्कृष्ट कामे केली आहेत, अशा तीन व्यक्तींना व संस्थांना हे पुरस्कार देण्यात येतात. व्यक्तींना दिल्या जाणाऱ्या पहिल्या, दुसऱ्या व तिसऱ्या पुरस्कारासाठी रोख रक्कम अनुक्रमे रु.१.०० लक्ष, रु.७५,०००/- व रु.५०,०००/- आणि मानपत्र तर संस्थांना दिल्या जाणाऱ्या पहिल्या, दुसऱ्या व तिसऱ्या पुरस्काराची रोख रक्कम अनुक्रमे रु.३.०० लक्ष, रु.२.०० लक्ष व रु.१.०० लक्ष आणि मानपत्र असे या पुरस्काराचे स्वरुप आहे. सदर शासन निर्णयामध्ये नमूद केलेल्या छाननी समितीच्या बैठकीत ठरल्याप्रमाणे अद्यापही सुयोग्य अर्ज प्राप्त करुन घेण्याकरिता सदर शासन निर्णयात सुधारणा करण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

अपर मुख्य सचिव, अल्पसंख्यांक विकास विभाग तथा अध्यक्ष, छाननी समिती यांच्या अध्यक्षतेखाली दि.२०.०९.२०१३ रोजी श्रीम. इंदिरा गांधी “राष्ट्रीय एकात्मता पुरस्कार” संदर्भांत छाननी समितीची बैठक घेण्यात आली होती. सदर बैठकीत ठरल्याप्रमाणे शासन निर्णय दि.२३.१०.२०१२ मध्ये पुरस्कारासाठी संस्था/व्यक्तींची निवड करण्याकरिता कार्यपध्दती निश्चित करण्यात आली आहे. त्यामध्ये अनुक्रमांक - १ येथे पुढील बाब अंतर्भूत करण्यात येत आहे.

**सदर पुरस्कारासाठी "प्राचार्य सामाजिक कार्य महाविद्यालय तसेच पोलिस अधिक्षक, जिल्हा समाजकल्याण अधिकारी व विद्यापीठाचे कुलगुरु दर्जाचे किंवा त्यावरील दर्जाचे अधिकारी व्यक्ती/संस्थेचे नामांकन करुन शकतील" ही बाब अंतर्भूत करण्यात येत आहे.**

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८१३१०४५३१९४१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ainul Chand Attar

Digitally signed by Ainul Chand Attar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=MDD, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Ainul Chand Attar
Date: 2014.08.20 18:40:28 +05'30'

**( अैनुल अत्तार )**
सहसचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा. राज्यपालांचे सचिव,
२) मा. मुख्यमंत्र्यांचे अपर मुख्य सचिव,
३) मा. मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
४) मा. मुख्यसचिव, मंत्रालय, मुंबई
५) अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग
६) सर्व विभागीय आयुक्त
७) सर्व जिल्हाधिकारी.
८) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
९) पोलिस महासंचालक व पोलिस महानिरिक्षक, मुंबई
१०) पोलिस आयुक्त, मुंबई
११) सर्व जिल्हा पोलिस आयुक्त/अधिक्षक
१२) सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्यांक आयोग, मुंबई
१३) उप सचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, अल्पसंख्यांक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१४) निवड नस्ती.